**अवर लेडी ऑफ लुर्डस चर्च, काटेमानिवली, कल्याण (पूर्व), जि.ठाणे संचलित सेंट ज्युड्स हायस्कूल, काटेमानिवली, कल्याण (पूर्व), जि.ठाणे शाळेचे नुतन ज्ञानमंदिर हायस्कूलजवळ, पुना-लिंक रोड, तिसगांव, के.डी.एम.सी., "डी" वॉर्ड, कल्याण (पूर्व), जि.ठाणे येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३३१९/प्र.क्र.४५२/एसएम-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ २०१२/(५९/१२) माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.**

**संदर्भ :**

**विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई यांचे क्र.शिउसं/माध्य-२/८९४/२०१९/१५७८, दिनांक ३ ऑक्टोबर, २०१९ चे पत्र**

**प्रस्तावना :-**

अवर लेडी ऑफ लुर्डस चर्च, काटेमानिवली, कल्याण (पूर्व), जि.ठाणे संचलित सेंट ज्युड्स हायस्कूल, काटेमानिवली, कल्याण (पूर्व), जि.ठाणे या इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित माध्यमिक शाळेचे नुतन ज्ञानमंदिर हायस्कूलजवळ, पुना-लिंक रोड, तिसगांव, के.डी.एम.सी., "डी" वॉर्ड, कल्याण (पूर्व), जि.ठाणे येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेचे अपुऱ्या भौतिक सुविधांमुळे संस्थेच्या मालकीच्या प्रशस्त इमारतीमध्ये स्थलांतर प्रस्तावित केले आहे. सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे. :-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(३) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत.

(४) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(५) सदर शाळा इंग्रजी माध्यमाची कायम विनाअनुदानित तत्वावरील असल्याने त्यामध्ये कार्यरत शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(६) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी सदर शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत ४ आठवडयात पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५१२४१०७७१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.02.15 12:42:46 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, ठाणे
४. अध्यक्ष/ सचिव, अवर लेडी ऑफ लुर्डस चर्च, काटेमानिवली, कल्याण (पूर्व), जि.ठाणे
५. निवडनस्ती ( एसएम-१).